# OUTLINES

OF

# GEOGRAPHY



# भूगोल विद्या.

## प्रथम पुस्तक.

सरकारी मराठी शाळांकरितां

बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर

यांणीं केलें.

चवथी आवृत्ति तपासून शुद्ध केली; ती

**बोर्ड आव् इड्युकेशन्**

यांचे आज्ञेवरून छापिली.

BOMBAY:
PRINTED AT GUNPUT CRUSHNAJEE'S
PRESS.
1854.

## शिक्षकांस सूचना.

पहिल्यानें पंतोजीनें धडा वाचावा, आणि ज्या स्थळांचें वर्णन केलें असेल तीं स्थळें नकाशावर दाखवावीं. धडा तयार झाल्यावर विद्यार्थ्यांची परीक्षा घ्यावी. शिक्षकानें परीक्षा घेतांना प्रश्नाची उलटापालट करावी; ती अशी कीं, प्रथम आपण नकाशावर स्थळें दाखवून शिकणारांस त्यांचीं नावें, ठिकाणें आणि तीं कशाकरितां प्रसिद्ध आहेत, हें पुस्तकांत सांगितल्याप्रमाणें पुसावें. नंतर आपण कोणतींही स्थळें सांगून तीं शिकणारांकडून नकाशावर दाखवावीं, आणि आपण कांहीं स्थळांचीं ठिकाणें व जाकरितां प्रख्यात असतील, तें सांगून त्यांचीं नावें पुसावीं.

# भूगोलविद्या.

## प्रथम पुस्तक.

### प्रकरण १.

शब्दपरिभाषा आणि पृथ्वीचे विभाग.



१ भूगोलविद्येमध्यें भूमीचें यथार्थ वर्णन आहे.

२ पृथ्वी गोलाकार आहे. तिजवर एक तृतीयांश भूमि आणि दोन तृतीयांश उदक आहे. पृथ्वी गोलाकार आहे ह्मणून गलबतांत बसून लोक तिचा आसमंतात फिरून परत निघालेल्या जाग्यास येतात, आणि चंद्रग्रहणीं तिची छाया वर्तुळ पडती. यामुळेंच दक्षिणेकडून उत्तरेकडे जाऊं लागलें असतां ध्रुवनक्षत्र उंच दिसूं लागतें.

३ चोहोंकडून पाण्यानें वेष्टित जी भूमि तिला **द्वीप** अथवा **बेट** (१) असें ह्मणावें.

४ पृथ्वीवर दोन **महाद्वीपें** (२) ह्मणजे मोठीं द्वीपें आहेत, त्यांत पहिल्या महाद्वीपांत युरोप, आशिआ,

आणि आफ्रिका, अशीं तीन खंडें आहेत. तीं पूर्वीपासून परस्परांस ठाऊक आहेत, या कारणास्तव त्यांस प्राचीन भूमि असें ह्मणतात. दुसऱ्या महाद्वीपांत अमेरिकाखंड एकच आहे. त्याचा शोध ३५२ वर्षांच्या पूर्वी कोलंबस नावाचा पुरुषानें लाविला. ह्मणून त्यास नवी भूमि असें ह्मणतात.

५ जो जमिनीचा प्रदेश तीन बाजूंकडून पाण्यानें वेष्टित असतो त्यास द्वीपकल्प (३) असें ह्मणावें.

६ भूमीचा दोन प्रदेशांस जोडणारी जी अरुंद जमीन तिला संयोगि भूमि (४) असें ह्मणावें.

७ जें जमीनीचें लांब टोंक समुद्रांत गेलें असतें त्यास भूशलाका किंवा भूशिर (५) असें ह्मणावें.

८ भूमीवर जे उंचवटे असतात, त्यांस डोंगर (६) असें ह्मणावें. मोठे उंच व फार लांब गेलेले जे डोंगर त्यांस पर्वत (७) असें ह्मणावें.

९ पृथ्वीवर सर्वत्र जो मोठा उदकाचा संचय आहे त्यास महासागर (८) असें ह्मणावें. या महासागराचा जो भाग हिंदुस्थान व आफ्रिका या दोहोंमध्यें आहे त्याचें नाव हिंदीमहासागर. ज्या महासागराचा पूर्वभागीं आफ्रिका आणि युरोप आहेत, तसेंच

पश्चिमेकडे आमेरिका आहे, त्याचें नाव **आट्लांटिक महासागर**. आशिआ, आणि आमेरिका यांचामध्यें जो महासागर आहे त्याचें नाव **पासिफिकमहासागर**.

१० महासागराचा जो भाग फारकरून भूमीनें वेष्टित असतो त्यास **समुद्र** अथवा **सागर** (९) असें ह्मणावें.

११ भूमीवर फार लांब गेलेला जो समुद्राचा फांटा त्यास **अखात** (१०) असें ह्मणावें.

१२ अखाताचें मुख रुंद असल्यास त्यास **उपसागर** (११) असें ह्मणावें.

१३ दोन समुद्र जोडणारा जो उदकभाग त्यास **सामुद्रधुनी** अथवा **संयोगिजल** (१२) असें ह्मणावें.

१४ चोहोंकडून भूमीनें वेष्टित जो उदकप्रदेश त्यास **सरोवर** ह्मणावें.

१५ डोंगर अथवा पर्वत किंवा सरोवर यांपासून निघालेला जो उदकाचा प्रवाह ती **नदी** (१३) होय. नदीचा उत्पत्तीचा स्थानास **उगम** आणि ती समुद्रास मिळालेल्या स्थानास **मुख** असें ह्मणावें.



## प्रकरण २.

### आशिआ खंड.

१ **मर्यादा आणि देशांचीं नावें.** आशिआखंडा-चा उत्तर, पूर्व, आणि दक्षिण, या तीन दिशांस **स-मुद्र** आहे, आणि पश्चिमेस **उरेलियन** अथवा **उरा-ल पर्वत**, **वोल्गा**, व **डोन**, ह्या नद्या, व **तुर्कीसमुद्र** आणि **भूमध्यसमुद्र**, हीं त्याचा आणि युरोपाचा म-ध्यें आहेत. **सुएझ** ही **संयोगिभूमि** आशिआ आ-णि आफ्रिका या दोन खंडांस जोडिती; या दोहोंचा मध्यें **आरबी समुद्र** आहे. आशिआ आणि आ-मेरिका यांचामध्यें **बेहरिंगची सामुद्रधुनी** आहे.

आशिआखंडांत बारा देश आहेत त्यांचीं नावें. उ-त्तरेस १ **रुशिआ** अथवा **रुशियनाचें** राज्य २ पश्चिमेस **तुर्कस्थान**, ३ **आरबस्थान**, मध्यभागीं ४ **इराण**, ५ **आफगाणिस्थान**, ६ **तातार**, ७ **तिबेट**; पूर्व, व दक्षि-णदिशांकडे ८ **चीन**, समुद्रांत ९ **जपान**, १० **सिआ-म** (**सुह्म**), ११ **ब्रह्मदेश**, १२ **हिंदुस्थान**.

२ **ध्यानांत ठेवण्याजोगे प्रांत.** १ रुशिआदेशां-त **सिर्कशिआ**, एथील लोक सुंदर व शूर आहेत;

सिबीरिआ, एथें थंडी फार, नद्या मोठ्या, आणि लोक अज्ञान आहेत. २ तुर्कस्थानांतील **जुडीआ** अथवा **पालेस्टेन** प्रांतांत ख्रिस्ताचा जन्म झाला व तो मारला गेला. याशिवाय **आर्मीनिआ** व **खाल्डीया** हे प्रांत ख्रिस्तीयन व इस्रायेल यांचा ग्रंथांत प्रसिद्ध आहेत. शिकंदरबादशाहा इ० स० चा पूर्वी ३२३ वे वर्षी **खाल्डीया** प्रांतांत मरण पावला.

३ **मुख्य शहरें.** १ रुशिआ देशांत; **आस्त्राखान**, वोल्गा नदीचा कांठीं. २ तुर्कस्थानांत; **आलेप्पो**, राजधानी, **बसरा**, फ्रात अथवा युफ्रातिस नदीचा कांठीं मोठी व्यापाराची जागा. **बगदाद**, पूर्वी खलीफ ह्मणजे मुसलमान धर्माचे मुख्य यांची राजधानी. **यिरूशिलिम**, इस्रायेल लोकांची राजधानी. **मोसल**, तैग्रिसनदीचा कांठीं. ३ आरबस्थानांत; **मक्का**, महंमदाची जन्मभूमि. **मदीना** त्याचें मृत्युस्थान. ४ इराणांत; **तेहरान** राजधानी. **इस्पाहान**, पूर्वीची राजधानी. **शिराज**, एथें मद्य चांगलें उत्पन्न होतें. ५ आफगाणिस्थानांत; **काबूल** राजधानी. **कंदाहार**, **गिझनी**, हे दोन बळकट किल्ले आहेत. ६ तातारांत; **समर्कंद**, **बुखारा**, **बलख**, या

प्राचीन मोंगलांचा नामांकित राजधान्या आहेत. ७ चीनांत; पेकीन राजधानी. नांकीन मोठें शहर, कंतान मोठें बंदर, पूर्वी परमुलखी लोकांस या एका बंदरांत मात्र येण्यास परवानगी होती. ८ जपानांत; जड्डो राजधानी, निफोन बेटांत. ९ सिआमांत; बांकोक, राजधानी, मीनामनदीचा कांठीं. १० ब्रह्मराज्यांत; अमरपूर, राजधानी इरावतीनदीचा कांठीं, आवा त्याच नदीचा कांठीं. ११ हिंदुस्थानांत; कलकत्ता, राजधानी. पाटणा, काशी, भागीरथीचा कांठीं. प्रयाग, गंगायमुनेचा संगमा जवळ. आग्रा, दिल्ली, यमुनेचा कांठीं. दक्षिणेंत मुंबई, मद्रास, इत्यादि.

४ पर्वत. १ आल्ताइ पर्वत, रुशिआदेशांत पूर्वसमुद्रापासून पश्चिमेपर्यंत आहे. २ तिबेटदेशाचा दक्षिणेस त्याचा व हिंदुस्थानाचामध्यें हिमालय. ३ हिंदुस्थानांत, सह्याद्रि. ४ तुर्कस्थानांत कौकसस व ५ टौरस.

५ द्वीपकल्प व संयोगिभूमि. १ तुर्कस्थानाचा पश्चिमभाग हा भूमध्यसमुद्र व तुर्कीसमुद्र यांमध्यें आहे. २ आरबस्थान. ३ मलक्का अथवा मला-

या. ४ कोरीआ चीनचा राज्यांत. कामूश्चाट्का, रुशियनाचा राज्यांत. हे सर्व देश तीन् बाजूंकडून समुद्राने वेष्टित आहेत, ह्मणून यांस द्वीपकल्प ह्मणावें; क्रो ही संयोगभूमि मलाया आणि सिआम यांचा मध्यें आहे.

६ भूशिरें. १ पूर्वकेप सर्वांहून पूर्वेकडील स्थल. २ केप लंपाट्का कामश्चाट्कामध्यें. ३ केप निम्पो चिनाचा पूर्वभागीं. ४ केप बोहडोर लुझोन बेटाचा उत्तरबिंदु. ५ केप रोमानिआ मलायाचा दक्षिणबिंदु. ६ केप कोमोरीन् (कन्याकुमारी) हिंदुस्थानाचा दक्षिणबिंदु. ७ रासअल् हद्द आरबस्थानाचा पूर्वबिंदु.

७ बेटें. १ हिमसमुद्रांत नोवाझेंब्ला. २ भूमध्यसमुद्रांत सैप्रस् आणि रोडस्. ३ हिंदीमहासागरांत, सिंहल, मालदीव लकदीव (ह्मणजे लक्षद्वीप), आन्दमान, निकोबार, सिंकापूर, व पिनांग. ४ हिंदी आणि पासिफिक या दोन महासागरामध्यें बेटें बहुत आहेत. त्यांतील मुख्यांचीं नावें. बोर्निओ, हें पृथ्वीमध्यें एक शिवाय करून सर्वांहून मोठें बेट. सुमात्रा बेट. जावा हें डचलोकांचा स्वाधीन आ-

हे. फिलिपैन बेटें, स्पेनचा ताबेंत आहेत. मसाल्याचीं बेटें सेलिबीस इत्यादि आहेत. ५ चीनचा कांठावर पोर्तुगीस लोकांचें मकाव; तसेंच हैनान; व पूर्वेस फोर्मोसा व लूच्यू हीं बेटें आहेत. ६ जपानचा राज्यांत निफोन, जेस्सो, क्यूस्यू, हीं आहेत. ७ तातार देशाचा कांठीं साघलीन; व कामूश्चाट्काचे पूर्वेस फोक्स बेटें आहेत.

८ समुद्र. १ पासिफिक महासागरांत चीनचा लगत चिनईसमुद्र, पूर्वसमुद्र, व पीतसमुद्र. २ जपान व तातार यांचामध्यें जपानी समुद्र. ३ कामूश्चाट्का आणि तातार यांचशामध्यें, ओखोट्स्कचा समुद्र. ४ हिंदी महासागरांत, बंगाळचा उपसागर. ५ हिंदुस्थान व आरबस्थान यांचामध्यें आरबी समुद्र. ६ आशिआ आणि आफ्रिका यांचामध्यें, आरबी अखात.

९ अखातें. १ हिमसागरांत ओबीचें अखात किंवा सागर. २ पासिफिक महासागरांत, अनादिराचें तोंकीनचें व सिआमचें हीं तीन अखातें आहेत. ३ हिंदीमहासागरांत मानारचें अखात सिंहल आणि हिंदुस्थान यांचामध्यें आहे. खंबायतचें अखात,

जांत नर्मदा आणि तापी ह्या नद्या मिळतात तें, व कच्छचें अखात आणि इराणी अखात हीं पश्चिमेकडेस आहेत.

१० सामुद्रधुन्या. १ बैगाल्स, नोवा झेमब्ला आणि सिबिरिआ यांचामध्यें. २ बेहरिंग याची आमेरिका व आशिआ यांचामध्यें. ३ तातारची खाडी, तातार व साघलीन बेट यांचामध्यें ४ कोरिआ व जपान यांचामध्यें कोरीआची सामुद्रधुनी. ५ बोर्निओ आणि सेलिबीस यांचामध्यें मक्कासराची सामुद्रधुनी. ६ हिंदुस्थान व सिंहल यांचामध्यें मानार. ७ आरबी अखातास जाण्याची खाडी बाबेल मांडेब. ८ आणि इराणचा आखाताचें द्वार हुर्मज्ञ आहे.

११ नद्या. १ लेना, २ ओबी आणि ३ येनिसी ह्या तीन नद्या आल्ताई पर्वतांतून निघून उत्तर महासागरास गेल्या आहेत. ४ आमूर त्याच पर्वतांत इचा उगम असून तातारदेशांतून पूर्वेस जाऊन ही ओखाट्स्कचा समुद्रास मिळाली आहे. ५ होआंगहो, आणि ६ यांगीचेंक्यांग ( अथवा क्यांगूच्यु ) ह्या नद्या तिबेटांतून निघून पूर्वेकडेस चिनांतून वहात

गेल्या आहेत. ७ ब्रह्मपुत्रा, आणि ८ इरावती त्याच पर्वतांतून निघून हिंदीमहासागरास मिळाल्या आहेत; आणि ९ सिंधु ही तेथूनच उत्पन्न होऊन हिंदुस्थानाचा पश्चिमेस गेली आहे आणि त्या देशाची पश्चिम सीमा होऊन आरबी समुद्रास मिळाली आहे. १० गंगा, ११ यमुना, १२ शरयू, (गोग्रा) इत्यादि नद्यांचा उगम हिमालयांत असून त्या बंगालचा उपसागरास मिळाल्या आहेत. १३ तैग्रिस व १४ युफ्रेतीस (फ्रात) ह्या टौरसपर्वतांतून निघून दोनही एकत्र मिळून इराणी अखातास गेल्या आहेत.

१२ सरोवरें. १ रुशिआ, तुर्कस्थान, तातार, व इराण यांचा मध्यें कास्पियन् (समुद्र) २ तातार देशांमध्यें आरल ३ सिबिरियामध्यें बैकाल. ४ तुर्कस्थानामध्यें वानशहराजवळ वान. ५ तिबेतामध्यें पाल्टि (पाण्याचा खंदक) व मानससरोवर आणि रावणऱ्हद. ६ जुडिआप्रांतामध्यें मृतसमुद्र. यांत मासे वांचत नाहींत व याचाजवळ झाडें होत नाहीत अशी कथा सांगतात.

१३ व्यापाराचे मुख्य जिनस. हिंदुस्थान-- नीळ, साकर, तांदूळ, रेशीम, कापूस, सोरा, मीठ,

अफीग; २ चीन—चाहा, रेशीम, मखमाल, धवा साकर, खेळणीं, मातीचीं भांडीं, कापुर, कागद, इ०; ३ आरबस्थान—घोडे, बुंद; ४ इराण—गालीचे, रेशीम, अत्तर, मद्य; ५ तुर्कस्थान—गालीचे, मनुका, अंजीर, घोडे, चामडें; ६ सिंहलद्वीप—हस्तिदंत, एबनी, (अबनस) मोतीं, दालचिनी, खोबरेल तेल; ७ ब्रह्मराज्य—साग वगैरे लांकूड; ८ आंबायनाबेट—जायफळ; ९ बांदा बेट—लवंगा; १० मलाया—कथील; ११ तिबेट शालीची लोंकर.

१४ धर्म व राज्यरीति. आरब, तुर्क, इराणी, आफगाण, मलाई व बहुधा सर्व तातार हे मुसल्मान आहेत. आर्मिनी हे ख्रिस्ती आहेत, व इस्रायेल हे इस्रायेल धर्म पाळतात. ब्रह्मी, श्यामी व चिनई हे लोक बौद्ध; ते बुद्धाचा अवतार लामा, याची पूजा करितात. हिंदुस्थानांतील लोक मूर्त्तिपूजक आहेत; व सिबीरिआ देशांत ही मूर्त्तिपूजा आहे. या सर्व देशांत राजा करील तें प्रमाण. कायदे आहेत तर खरे परंतु राज्यकर्त्यांचा मनास येईल तेव्हां ते कायदे मोडितात अशी राज्यरीति आहे.

## दुसऱ्या प्रकरणाची पुरवणी.

### हिंदुस्थानाविषयीं विस्तार.

१ हिंदुस्थानाचे तीन भाग आहेत. पहिला भाग **उत्तर हिंदुस्थान**, हा हिमालय आणि शिवालिक पहाड यांचामध्यें आहे, आणि यांत बुतान, नेपाळ, काश्मीर इत्यादि प्रांत आहेत. दुसरा भाग, **मध्यदेश**, शिवालिक पहाड आणि नर्मदा यांचामध्यें आहे. त्यांतील प्रांत येणेंप्रमाणें.

| प्रांत. | मुख्यशहरें. |
|---|---|
| पंजाब………… | १ लाहोर, राजधानी रवीचा कांठीं आणि २ अमृतसर. |
| मुलतान व शिंध. | १ मुलतान व २ हैदराबाद. |
| रजपूतस्थान …… | १ अजमीर, २ जयपूर, ३ उदेपूर. |
| गुजरात व कच्छ | १ खंबायत, २ बडोदें, ३ भडोच. |
| दिल्ली………… | १ दिल्ली, २ मिरत, ३ सरहिंद |

| | |
|---|---|
| आग्रा............ | १ आग्रा ( यांत अकबराची कबर व ताजमहाल आहे ). २ कनोज ३ ग्वाल्हेर. |
| प्रयाग ( अलहाबाद. ) | १ काशी. |
| माळवा......... | १ उज्जनी, २ इंदूर. |
| आयोध्या......... | १ लखनौ, २ फैजाबाद, ३ आयोध्या. |
| बाहार............. | १ पाटणा, २ मोंगीर ( भागीरथीचाकांठीं. ) |
| बंगाला ( गौड )..... | १ कलकत्ता, २ मुर्शिदाबाद ३ डाका. |

तिसरा भाग. दक्षिण हिंदुस्थान हा नर्मदेचा दक्षिणेस आहे. याचा जो प्रदेश नर्मदा आणि कृष्णा यांचा मध्यें आहे त्यांत मुख्य शहरें. मुंबई, सुरत, पुणें, आणि हैदराबाद, हीं आहेत. कृष्णेचे दक्षिणेस मद्रास, श्रीरंगपट्टण, अर्काट हीं मुख्य शहरें आहेत, २ वर लिहिलेल्या नद्यांशिवाय, भागीरथीस मिळणाऱ्या नद्यांतून मुख्य मेग्ना, शोण आणि कुशी ह्या आहेत. सिंधूस मिळणाऱ्या मुख्य पांच नद्यांचीं नावें,

बहुत अथवा जहिलम, रवी, चिनाब, बिया, आणि सत्लज. तशाच, महानदी, तापी, गोदावरी, आणि कृष्णा ह्या नद्या दक्षिणेत आहेत.

३ हिंदुस्थानांतील राज्याचे चार इलाखे आहेत. बंगाल, आग्रा, मद्रास आणि मुंबई.

४ बंगाल इलाख्याखालीं बंगाल, बाहार, उडीसा, आसाम, आराकान, वगैरे प्रांत आहेत. यांतून पहिले तीन सन १७५८ त लढाई करून बंगालचा सुभेदार सुजाउद्दवला याजकडून घेतले, आणि पुढें लढाया होऊन राज्य उत्तरोतर वाढत चाललें.

५ आग्रा या इलाक्याखालीं प्रयाग, आग्रा, व दिल्ली हे प्रांत आहेत; यांचा कारभार पूर्वी बंगाल्याखालीं होत होता. हे प्रांत बहुतकरून सन १८०३ चा सुमारें जा लढाया झाल्या त्यांत मिळाले.

६ मद्रास इलाक्याखालीं कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांचे दक्षिणेकडील प्रदेश व तेलंगण आहे. हा बहुतकरून सर्व प्रांत अर्कॉट व तंजावर एथील राजांकडून मिळाला; व बाकीचा उत्तरेकडील व पश्चिमेकडील सन १७९९ यामध्यें टिपूचा लढाईंत मिळाला.

७ मुंबई इलाक्याखालीं गुजराथ, खानदेश,

महाराष्ट्र अथवा घांटावरचा देश, उत्तर व दक्षिण कों कण, व दक्षिण महाराष्ट्रदेश इतके प्रांत. आहेत. या इलाक्याची हुजूर सरकारची जागा मुंबईबेट; हें पोर्तुगीज राजापासून इंग्रेजांचा राजा दुसरा चार्लस यास सन १६६१ मध्यें आंदण मिळालें. गुजराथ प्रांत बहुतकरून गायकवाड याणें तहानें दिला; व बाकीचा घांटावरील व घांटाखालचा मुलुख पेशव्यांपासून सन १८१७ त मिळाला. यांत गुजराथेमध्यें सुरत भडोच, खेडें, व आमदाबाद; खानदेशांत धुळें; घांटावरील देशांत, नगर, पुणें, व सोलापूर; कोंकणांत ठाणें, रत्नांगिरी; आणि दक्षिण महाराष्ट्रदेशांत बेळगांव व धारवाड असे मुलकी कारभाराचा सोईकरितां बारा जिल्हे केले आहेत.

८ हिंदुस्थानांत इंग्रेज सरकारचा आश्रयाखालीं संस्थानें आहेत तीं येणेंप्रमाणें.

मद्रासइलाक्यानजीक त्रावणकोर, कोचीन, हौसुर, आणि हैदराबाद. मुंबईइलाक्यानजीक. कोल्हापूर, सातारा, गायकवाड, ( बडोदें ), कच्छ ( भूज) सांवतवाडी. आग्राइलाक्याचे नजीक होळकर, (इंदूर), शिंदे (ग्वाल्हेर), भरतपूर, व सतलजनदी.

चा कांठाचे शीकसंस्थानी, भोपाल, बुंदेलखंडांतील झांशीं, रेवा इ०. रजपूतसंस्थानी उदेपूर, जोतपूर, विकानीर, जयपूर इ० बंगालइलाक्यानजीक. भोंसले (नागपूर) अयोध्येचा नवाब. हिंदुस्थानाचा सरहद्दीवर पंजाब, नेपाळ, सिकिम, भुतान इ०.

---

## प्रकरण ३.

## युरोप.

१ युरोपाची उत्तरमर्यादा उत्तरमहासागर अथवा हिमसागर; पश्चिमेस आट्लांटिकसागर; दक्षिणेस भूमध्यसमुद्र आणि पूर्वेस तुर्की व अझोवचा समुद्र, वोल्गा आणि डॉन् ह्या नद्या, आणि उराल पर्वत. युरोपामध्यें वेगळालीं राज्यें १९ आहेत त्यांचीं नावें. उत्तरेस १ रुशिआ, २ स्वीडन आणि नॉर्वे, ३ डेन्मार्क, मध्यमार्गी ४ जेर्मनींतील संस्थानें, ५ आस्त्रिआ, ६ प्रुशिआ, ७ स्विट्सेर्लान्ड,*८

---

* लान्ड ह्मणजे प्रदेश किंवा भूमि.

होलान्ड, आणि ९ बेल्‌ज्यम; दक्षिणेस, १०. फ्रान्स ११ स्पेन, १२ पोर्तुगाल १३ नेपल्स, १४ सार्डीनिआ, १५ टस्कानी, १६ पोप याचें राज्य, १७ तुर्कस्थान, १८ ग्रीस; समुद्रामध्यें, १९ ग्रेटब्रिटन आणि अयर्लान्ड ह्मणजे इंग्रेजांची विलायत.

२ यांत आस्त्रिआ व प्रुशिआ आणि लहान संस्थानें मिळून साऱ्या देशांचें नाव जर्मनी. यादेशांत संस्थानें पसतीस आहेत. त्यांचा रक्षणाकरितां एक जमाव झाला आहे. नेपल्सपासून पुढील चार व आणखी कांहीं लहान संस्थानें मिळून इतालीदेश. हीं पूर्वीं रूमी लोकांचा राज्याची जागा होती. ग्रीस एथील लोक ग्रीक हे फार शहाणे असा पूर्वीं लौकिक होता; एथेंच शिकंदरबादशाहा झाला. इंग्लान्ड, फ्रान्स, आस्त्रिआ, प्रुशिआ, आणि रुशिआ हे देश सांप्रत पृथ्वीवर मोठे प्रबळ व सुधारलेले आहेत. आणि होलान्डदेशांत व्यापार व उद्योग फार चालत आहे. स्वित्सर्लान्डांत डोंगर व रानें फार आहेत. वर राज्यें लिहिलीं यांखेरीज आणखी एक पोलान्ड ह्मणून राज्य होतें तें ५० वर्षांवर रुशिआ, आस्त्रिआ, आणि प्रुशिआ, या तिघांनीं वांटून घेतलें. ग्रेटब्रिटन देशांत वे-

ऌस् आणि स्कॉटलान्ड हे मुख्य प्रांत आहेत.

३ मुख्यशहरें; १ रुशिआ, संटपीटर्सबुर्घ,* राजधानी, नेवानदीचा कांठीं; मास्को जुनी राजधानी. २ स्वीडिन आणि नोर्वे, स्तोक्हाम राजधानी बाल्टिक समुद्रांत कित्येक बेटांवर; बेर्गन, क्रिस्तिआनिआ ३ डेन्मार्क, कोपेनहेगन राजधानी झीलान्ड बेटांत आहे; आअल्बोर्ग. ४ जर्मनींतील संस्थानें, ड्रेसडेन साक्सनी संस्थानाची राजधानी. लैप्सिक, बाजाराची जागा. हानोवर त्याच नावाचा संस्थानाची राजधानी. हामबुर्घ, लुबेक, फ्रांकफोर्ट आणि ब्रेमेन, या चार शहरांत त्यांतीलच कामदार तथील कार्याप्रमाणें अधिकार चालवितात. ५ आस्त्रिआ, वियेन राजधानी डान्युबनदीचे कांठीं. मिलान इतालीदेशांतील आस्त्रिअन राज्याचें मुख्य शहर. वेनिस हें पूर्वी व्यापाराकरितां प्रसिद्ध होतें. ६ प्रुशिआ, बर्लिन राजधानी. ७ स्वित्सेर्लान्ड, बेर्न राजधानी; जिनीवा, त्याच राज्यांतल्या सरोवराचा कांठीं आहे. ८ हॉल्लान्ड, आमस्तेर्डाम राजधानी. लेडेन मोठ्या शाळेची जागा. ९ बेल्जयम्, ब्रुसे-

---

* बुर्घ ह्मणजे शहर.

ल्स राजधानी. १० फ्रान्स, पारिस राजधानी, सेन नदीचा कांठीं. लयांस, नांत्स, मार्सेल्स, हीं बंदरें आहेत; आणि डंकिर्क, ब्रेस्त आणि तूलों ह्या आरमाराच्या जागा आहेत. ११ स्पेन, माद्रिड राजधानी, मांझानारेस नदीच्याकांठीं. टोलडो, तेगस नदीचा कांठीं. सालमांका, पूर्वीं याची शाळेकरितां प्रसिद्धि होती. केडिझ बंदर आहे. जिब्राल्टर इंग्रजांचा स्वाधीन एक मजबूत किल्ला आहे. १२ पोर्तुगाल, लिझ्बोन राजधानी. ओपोर्टो द्राक्षासवाकरितां प्रसिद्ध आहे. १३ इतालो, तूरिन, पोनदीचे कांठीं, सार्डिनिआची राजधानी. जिनोआ पूर्वीची व्यापाराची जागा. फ्लोरेन्स आर्नोनदीचे कांठीं टस्कानी देशाची राजधानी. रूम, (रोमकपत्तन) प्राचीन काळीं मोठें विख्यात होतें. आतां पोप याची राजधानी आहे. नेपल्स, या देशाची राजधानी. १४ तुर्कस्थान, कोन्स्तांतिनोपल, (कुस्तंतुनिआ, नवें रूम शाम) राजधानी. बेल्ग्रेड, हें वायव्येकडील सीमेवर मोठें मजबूत शहर आहे. १५ ग्रीस, अथेन्स राजधानी. पूर्वीं यांत स्पार्टा, कोरिंथ थीब्स, इत्यादि बहुत नामांकित शहरें होतीं. १६

ग्रेटब्रिटन् व आयर्लान्ड, लन्डन इंग्लान्डाची राजधानी. एडिनबरो, स्काट्लान्डाचें मुख्य शहर. डब्लिन, आयर्लान्डाचें मुख्य शहर. यांशिवाय लिवर्पूल, ब्रिस्तल, मांचेस्तर, बिर्मिन्घाम, शेफील्ड हीं शहरें व्यापार व कसब यांकरितां प्रसिद्ध आहेत. आक्सफोर्ड आणि केंम्ब्रिज ह्या दोन विद्येच्या जागा आहेत. स्काट्लान्ड प्रांतांत ग्लासगो, ही मोठी व्यापाराची जागा आहे.

४ पर्वत. १ आल्प्स हा पहाड पूर्वेस इतालीआणि पश्चिमेस व उत्तरेस फ्रान्स, स्वित्सेर्लान्ड व जर्मनी यांचामध्यें आहे. २ आपिनैन इतालींमध्यें दक्षिणोत्तर आहे. ३ पिरिनीस फ्रान्स आणि स्पेन यांचामध्यें. ४ कार्पेथिअन आस्त्रिआदेशांत हंगारिप्रांताचे उत्तरेस. ५ डोफरफील्ड नोर्वे आणि स्वीडेन यांचामध्यें. ६ उरेलिअन, युरोप आणि आशिआ यांचामध्यें. ७ ग्राम्पिअन स्काटलान्ड यांमध्यें. ७ चेविअट डोंगर इग्लांड एथें आहे. ज्वालामुखी पर्वत. १ एट्रना, सिसिलींमध्यें आहे. २ वेसुविअस, नेपूल्स शहराजवळ. ३ हेक्ला ऐसूलान्ड बेटांत. ४ मोंटब्लांक हें आल्प्स पहा-

ह्याचें फार उंच शिखर आहे, आणि ५ मोंटसेराट्ट स्पेनदेशांत आहे; त्यावर ख्रिस्ती तपस्वी राहातें.

५ द्वीपकल्पें व संयोगीभूमि. नोर्वे आणि स्वीडेन या द्वीपकल्पास पूर्वी (१) स्कांडिनेविआ ह्मणत असत. याखेरीज डेन्मार्क देशांत (२) जटूलान्ड; तुर्कीसमुद्रांत (३) क्रिमीआ; भूमध्य समुद्रांत (४) स्पेन आणि पोर्तुगाल; आणि ग्रीस देशांत (५) मोरिआ इतकीं द्वीपकल्पें आहेत. मोरिआ आणि ग्रीस देश यांस जोडणारी (१) कोरिंथेची संयोगीभूमि आणि क्रिमीआ व तातार यांचामध्यें परिकोप अथवा प्रीकोप नामें संयोगीभूमि आहे.

६ भूशिरें. १ उत्तर केप, युरोपाचें उत्तर टोंक. २ व्राथ स्काटलान्डचे उत्तरेस आहे. ३ केपक्लीर आयर्लांडचे दक्षिणेस. ४ लान्डस्एन्ड इंग्लान्डचे नैर्ऋत्येस आहे. (५) ओर्टिगाल, फिनिस्तेर, व त्राफाल्गार हीं स्पेनदेशचीं अनुक्रमें उत्तर पश्चिम आणि दक्षिण या दिशांकडील टोंकें. (६) सेंटविन्सेंट आणि रोका पोर्तुगालदेशामध्यें. (७) स्पार्टिवेन्टो आणि माटापान इतालो व ग्रीस यांचीं अनुक्रमें दक्षिण शिरें आहेत.

७ **बेटें.** (१) **स्पिट्सबेर्जेन, डेगो, उएसेल** हीं उत्तरसागरांत रुशिअन यांचा ताब्यांत आहेत. बाल्टिकसमुद्रांत. (२) **लोफोडेन, आल्यान्ड** आणि **गोथलान्ड,** हीं स्वीडिनचे ताबेंत आहेत. (३) **झीलान्ड** आणि **फुनेन,** तसेंच आट्लांटिकसागरांतील **ऐसलान्ड** हीं डेन्मार्कचीं आहेत. या ऐसलान्ड बेटची हवा फार थंड आहे, आणि त्यांत ज्वालामुखी व उष्णोदकाचे झरे आहेत. तयील मुख्य शहराचें नाव स्कालहोल्ट आहे. (४) **ग्रेटब्रिटन व अयर्लान्ड** व त्यांचा उत्तर, पश्चिम आणि दक्षिण कांठावरील **ओर्कने,** वगैरे बेटें मिळून इंग्रेजांचें राज्य असें पूर्वी लिहिलेंच आहे. आट्लांटिकसागरांत. (५) **आझोरेस** बेटांत पोर्तुगीस लोकांचा अंमल आहे. भूमध्यसमुद्रांतील; (६) **माजोर्का, मीनोर्का** आणि **इविसा** हीं स्पेनचा राज्यांतील अंशभूत आहेत. (७) **कोर्सिका,** बोनापार्ट याची जन्म भूमि, एथील अधिकार फ्रान्सदेशाकडे आहे; आणि (८) **एल्बा** हें बेट त्याणे फ्रान्सचें राज्य सोडल्यावर त्यास जाहागीर दिलीं होती; तें सांप्रत टस्कानि संस्थानाकडे आहे. (९) **सार्डिनिआ** त्याच नावाचा देशाकडे; आणि (१०)

सिसिली व त्याचे उत्तरेकडील बारा (११) लिपारी बेटें, हीं नेपल्स एथील राज्याकडे आहेत. त्याचेच दक्षिणचें (१२) माल्टा, हें मजबूत तटबंदीदार बेट, इंग्रेजांचा राज्याखालीं आहे. ग्रीसदेशाचे पश्चिमेस (१३) कार्फू, वगैरे सात बेटें मिळून इंग्रेजांचा आश्रयाखालीं एक प्रजासत्ताक स्वतंत्र संस्थान आहे, भूमध्यसमुद्राचा पूर्व प्रदेशीं (१४) कान्डिआ, रोड्स, सायप्रस इत्यादि बेटें तुर्कस्थानाचा अमलाखालीं आहेत.

८ समुद्र. उत्तरमहासागरांत, १ श्वेतसमुद्र रुशिआचे उत्तरेस आहे. आटलांटिक महासागरांत २ जर्मानसमुद्र ब्रिटन आणि डेन्मार्क यांचामध्यें आहे. ३ बालटिकसमुद्र याचे वायव्येस स्वीडेन आणि आग्नेयीकडेस प्रुशिआ आणि रुशिआ आहेत. ४ भूमध्यसमुद्र युरोप आणि आफ्रिका यांचामध्यें आहे. ५ तुर्कीसमुद्र, ६ आझोफ, अथवा आझोव आणि ७ मार्मोरा, हे तीन युरोप आणि आशिया यांच्यामध्यें आहेत.

९ अखातें आणि उपसागर. उत्तर महासागरांत

१ **कान्डलास्काया** २ **ऑनिगा** आणि ३ **आर्खेन्जल**, श्वेतसमुद्राचे फांटे. ४ **बॉथ्निआ** ५ **फिन्लान्ड** आणि ६ **रीगा**, हे बाल्टिक समुद्राचे फांटे. आटलांटिक महासागरांत ७ **बिस्केचा** उपसागर फ्रान्सचे दक्षिणेस आहे. तसेंच ८ **लयोंसचें**, ९ **जेनोआचें** १० **वेनिसचें**, (आद्रिआटिक समुद्र) आणि ११ **टारेन्टो** हीं अखातें इतालीचा पश्चिमेचे आणि पूर्वेचे बाजूस; आणि १२ **कॉरिंथाचें** अखात ग्रीस देशाचा कांठीं, हे सर्व भूमध्यसमुद्राचे फांटे आहेत.

१० **खाड्या आणि सामुद्रधुन्या**. १ **अयरिश** खाडी, अयर्लन्ड आणि इंग्लान्ड यांचामध्यें. २ **ब्रिटिश** खाडी, ब्रिटन आणि फ्रान्स यांचामध्यें. ३ **स्केगररॉक** आणि ४ **काटिगाट** ह्या दोन मिळून बाल्टिक समुद्राचें द्वार आहे. **सौंड** ही सामुद्रधुनी झीलान्ड बेट आणि स्वीडेन यांचामध्यें आहे. ४ **डोवेर** इंग्लान्ड आणि फ्रान्स यांचामध्यें. ५ **जिबराल्टर**, स्पेन आणि आफ्रिका यांमध्यें. ६ **बोनिफाचिओ**, सार्डिनिआ व कॉर्सिका यांमध्यें. ७ **मेस्सीना**, सिसिली आणि इताली यांमध्यें. ८ **कुस्तंतुनिआ**, मार्मोरा आणि तुर्कीसमुद्र यांचामध्यें. ९

काफा तुर्की आणि आझोफ या दोन समुद्रांमध्यें आहे.

११ नद्या. १ रुशिआ, वोल्गा, ही युरोपांत सर्वांहून मोठी नदी आस्त्राखान शहराजवळ कास्पिअन समुद्रास मिळती. डुवींना नदी श्वेतसमुद्रास गेली आहे. डोन् आझोफ समुद्रास मिळती. डीयेपेर तुर्की समुद्रास खेर्सोन शहराजवळ मिळती. २ जर्मनी, डान्युब जर्मनी व तुर्कस्थान या देशांतून जाऊन पांचमुखानीं तुर्की समुद्रास मिळती. इचा कांठीं, राटिस्बोन, वियेन (राजधानी) प्रेसबुर्ग बुडा आणि बेल्ग्रेड हीं शहरें आहेत विस्तुला नदी बाल्टिक समुद्रास मिळती, इचा कांठीं वार्सा, थोर्न आणि डांतसिक्, हीं शहरें आहेत. एल्ब नदी जर्मनी समुद्रास मिळती तिचा कांठीं ड्रेस्डेन व हांबुर्ग हीं शहरें आहेत. ३ फ्रान्स, स्वित्सेर्लान्ड, होल्लान्ड, व बेल्ज्यम, शेल्ट आणि मेझ्झ ह्या नद्या फ्रान्स देशांत उगम पावून खालीं जर्मन समुद्रास मिळाल्या आहेत. पहिलीचा कांठीं आंत्वेर्प आणि दुसरीचा कांठीं ब्रसेल्स व रोटेर्डाम हीं शहरें आहेत. रैन ही नदी आल्प्स पाहाडांतून निघून जर्मनी आणि होल्लान्ड या दे-

शांतून जर्मन समुद्रास मिळायास गेली आहे. वर्मस. मेन्त्स, कोलोन आणि लेडेन, हीं तिचा कांठीं मोठीं शहरें आहेत. ४ फ्रान्स देशांत रोन नदी भूमध्यसमुद्रास मिळाली आहे. लोअर आणि गारोन ह्या बिस्केचा उपसागरास आणि सेन ही इंग्लिशखाडीस मिळाली आहे. ५ स्पेन देशांत पश्चिमवाहिनी तेगस, इचा कांठीं टोलिडो, आणि मुखाजवळ लिज़्बोन आहे. ही खेरीज डूर्गो आणि एब्रो अशा दोन नद्या आहेत. ६ इतालींत पो पूर्ववाहिनी वेनिसचा अखातास मिळाली आहे. तीबेर नदीचा कांठीं रूम आहे. ७ इंग्लान्डामध्यें मुख्य नदी टेम्स, इचा कांठीं राजधानी लन्डन शहर आहे. तीशिवाय हम्बर, टे, त्वीड, सेवेर्न, अशा लहान कितीएक आहेत.

१२ सरोवरें. १ रुशिआ, लाडोगा आणि ओनिगा, २ स्वीडेन वेनेर आणि वेट्टर, ३ हॉलान्ड, हार्लेमसागर. ४ स्वित्सेर्लान्ड, कोन्स्तान्स आणि जिनीवा. ५ इतालीचे उत्तरेस कोमो आणि माज्जिओरे.

१३ व्यापाराचे जिनस. १ ब्रिटन, कथील,

कोळसे, कापसाचें व लोंकरीचें कापड, लोखंडी सामान, कांच, यंत्रें, कागद, इ०. २ रुशिआ, स्वीडेन व नोर्वे; चामडीं, चरबी, डामर, लांकूड, ताग, लोखंड, तांबें, इ०. ३ होलान्ड, गुरें, लोंध्र, माशांचें तेल, वगैरे. ४ फ्रान्स, द्राक्षासव, मद्य, रेशमी व लोंकरीचें कापड, कांच, इ०. ५ स्पेन आणि पोर्तुगाल, लोंकर, द्राक्षासव, बदामें, नारिंगें, इ०. ६ जर्मनी, ताग, वाख, तंबाखू, लोंध्र, लांकूड, लोंकर, द्राक्षासव, इ०. ७ इताली, गोडीं तेलें, फळें रेशीम. संगमरवरी पाषाण, इ०. ८ पोलान्ड, गहूं, क्राकोशहरांतील खाणींमधलें मीठ. ९ तुर्कस्थान, गालीचे, कातडीं, रेशीम, किराणा बुंद आणि अंजीर.

१४ धर्म आणि राज्यरीति. युरोपांत मुसलमानाचा धर्म एका तुर्कस्थानामध्यें मात्र आहे. बाकी सर्वत्र खिस्ती धर्म आहे. त्यांत फ्रान्स आणि जर्मनी यांपासून सर्व दक्षिण देशांत रोमान क्याथोलिक नामें मत चालतें; त्या मताचा गुरू पोप हा रूम एथें असतो. ग्रीक आणि रुशिअन यांचें मत यासारिखेंच; परंतु कांहींसें वेगळें आहे; त्यांचा गुरु पेत्रिआ-

र्व कुस्तंतुनिआ एथें राहतो. उत्तरेकडील सर्व देशांत प्रोतेस्तान्ट नामें मत चालत आहे.

तुर्कस्थान, रुशिआ आणि आस्त्रिआ, या तीन देशांचे आणि इतालो देशाचा कांहीं संस्थानचे राजे आपल्या मर्जीप्रमाणें राज्य करितात. बाकी सर्व देशांत प्रजांचा संमतानें कायदे ठरवून त्यांप्रमाणें राजे राज्य करितात. स्वित्सेर्लान्ड एथें प्रांतांतले संभावित लोकच अधिकार चालवितात.

---

## प्रकरण ४

## आफ्रिका.

१ मर्यादा. पूर्वेस आणि दक्षिणेस हिंदीमहासागर, पश्चिमेस आट्लांटिक, उत्तरेस भूमध्यसमुद्र. यांतील देशांचीं नावें. १ उत्तरेस बार्बेरे संस्थानें पांच मोरोक्को, फेज आल्जीर्स, तुनिस, त्रिपोली आणि इजिप्त, ( मिसर ) २ पश्चिमेस गिनी; आशान्टी दहोमे कोंगो वगैरे. ३ पूर्वेस. नुबिआ, आबिसीनीआ, ( हबसी देश ) वगैरे. ४ दक्षिणेस

केप आव् गुड होप, होटेंटोटदेश, काफरिस्थान.
५ मध्यभागी, बोर्नु, फेझान, तिम्बकतु, या खंडा-
चा शोध अद्यापि पुरता नाहीं, ह्मणून त्यांतील माहीत-
गारी थोडी आहे.

२ मुख्यशहरें. १ मिसरदेश, कहिरा राजधा-
नी. आलेक्सांद्रिआ मोठा शिकंदर बादशाह याणें
वसविलें. सुएझ आणि कोसेर हीं दोन आरबी अ-
खातावर बंदरें आहेत. लक्सारें एथें प्राचीन स्तंभ
व इतर कामें आहेत. हा इजित देश पूर्वी मोठा ना-
मांकित होता, आणि त्यांत बहुत राज्यांचा घडा-
मोडी होऊन, आतां तो तुर्कस्थानाचा अमला-
खालीं आहे. २ बार्बेरे संस्थानें, मोरोक्को, फेझ,
आलजीर्स, (फ्रेंच यांचें) त्रिपोली आणि तुनिस
या संस्थानचीं मुख्य शहरें त्याच नावाचीं आहेत.
स्यूटा हा मजबूत किल्ला स्पेन याचा समोर आहे.
फेझ प्रांतांत तान्जीर आणि तेतुआन हीं बंदरें आ-
हेत. ३ पश्चिम कांठावर आबोमी, कुमासी, हीं
आहेत. तसेंच सालवादोर हें कोंगोमध्यें पोर्तुगीस
लोकांचें राजधानी शहर आहे. सिएरालिओन हें
इंग्रेजांचे ताबेंत आहे. ४ पूर्व कांठावर मोझांबी-

क हें पोर्तुगीस संस्थान. सन्नार, डोंगोला, हीं नुबिआ प्रांतांतील मुख्य शहरें आहेत. गोन्दार, हें हबर्सी देशांतील मुख्य शहर आहे. ५ दक्षिणेस केप शहर इंग्रजांचें. ६ मध्यभागीं, मुर्झुक फेझान याचें मुख्य शहर. बोर्नु बोर्नू याचें मुख्य शहर. तिम्बक्तू आणि बूस्सा हीं नीजेर नदीचा कांठीं आहेत.

३ पर्वत, व ओसाड प्रदेश. आटलास, मिसर देशापासून पश्चिमेस समुद्रापर्यंत. चंद्रपर्वत आणि कोंग हे सिएरालिओन यापासून हबस देशापर्यंत गेले असतील असा सुमार आहे. पूर्वेकडेस लुपाटा पर्वत आहे आणि आरबी अखातार्शी समांतर ही एक पर्वत आहे. बार्बरदेशापासून नीजेर नदीपर्यंत साहाग नामें ओसाड प्रदेश आहे. तसेंच सिलिमा, लिबिआ, आणि बार्का हे प्रदेश मिसर देशाचे पश्चिमेस आहेत.

४ भूशिरें. केप बोन सिसिलीचा समोर; ब्लान्को पश्चिमेकडील बिंदु; वेर्डे, सेनिगाल नदीचा मुखाजवळ, पाल्मास गिनीचा कांठीं केप आव गुड होप इंग्रजांचें संस्थान गामा याणे १४९७ त शोधून काढिलें; ग्वार्डफई पूर्वबिंदु.

५ बेटें. १ हिंदीमहासागरांत, मादागास्कर, तेथील राजाचा ताबेंत आहे. मॉरिशिअस, इंग्रजांचें; बुर्बों फ्रेंचांचें; २ आटलांटिक महासागरांत, आझोरेस, केपवर्ड, आणि मादेरा द्राक्षासवाकरितां विख्यात, हीं पोर्तुगीस लोकांकडे आहेत. कानेरी बेटें स्पेनचा ताबेंतील, यांत टनेरीफ नामें उंच पर्वत आहे. फर्नान्डोपो, सेनिगालनदीचा कांठावरचें; आणि सेंटहिलीना बोनापार्टीचा कबरेचें स्थान हीं इंग्रजांचा हातीं आहेत.

६ अखातें आणि उपसागर. १ भूमध्यसमुद्रांत, सीद्रा, आणि आबुकीर. २ आटलांटिक महासागरांत, टब्लूबे, केपशहरालगत; गिनीचें अखात त्या प्रांताचा कांठावर, ३ हिंदीमहासागरांत डेलागोआ, सोफाला हे दोन उपसागर, मादागास्कर याचे पश्चिमेस आहेत. याच बेटाचे पश्चिमेस जी खाडी आहे तीस मोझाम्बीकची खाडी ह्मणतात.

७ सरोवरें. मारवी, लुपाटा पर्वताचे पश्चिमेस आहे. तशीच डेम्बीआ हें नीजेरनदीचा प्रवाहेंकरून झालें आहे. च्याद हें मोठें सरोवर मध्यभागीं आहे.

८ **नद्या.** नील नदी हबसी देशांत उत्पन्न झाली आहे ती मिसर देशांतून उत्तरेकडेस वहात जाऊन दोन मुखानी भूमध्यसमुद्रास आलेक्सांद्रिआ शहरा जवळ मिळाली आहे. मिसर देशांत पाऊस थोडा पडतो, ह्मणून ह्या नदीचा पुरावर शेतकी होती. नीजेर नदी कोंग पर्वतापासून उत्पन्न होऊन तिम्बक्तू पर्यंत जाऊन तेथून दक्षिणवाहिनी होऊन गिनीचा अखातास मिळाली आहे. हिचा उगमाचा शोध लावण्याकरितां इंग्रजलोकानी फार प्रयत्न केला आहे, आणि त्या उद्योगांत कितीएक लोक मरून गेले आहेत. सेनिगाल आणि गाम्बिआ ह्या ही नद्या कोंगपर्वतांतून उत्पन्न होऊन आट्लांटिक महासागरास गेल्या आहेत.

९ **व्यापाराचे जिनस.** गिनी व झांझिबार या किनाऱ्यापासून सोन्याची माती, हस्तिदंत, अबनस शहामृगाचीं पिसें कस्तुरी वगैरे येतात. केप व मादेरा एथून मद्य, बुर्बो व मोरिशिअस एथून बुंद व साकर बाहेर जाती. मोरोक्को, एथून चांगलीं कातडीं, शहामृगाचीं पिसें, वगैरेपर मुलखीं जातात. याशिवाय पूर्वी आफ्रिकाखंडाचा कांठावरून गु·

ल्याम नेऊन युरोप आणि आमेरिका एथें विकित अ-सत. परंतु तो व्यापार आतां युरोपिअन सरकारांनी मना करून बहुत लोकांस स्वतंत्र केलें आहे.

१० धर्म आणि राज्यरीति. आफ्रिकादेशाचे उ-त्तरेकडील लोक बहुधा मुसलमान आहेत. हबशी देशांत कांहीं इस्रायेलांचा व ख्रिस्ती धर्म आहे. दक्षिणेकडील काळे, जाड ओठांचे, व लोकरीसारिख्या केसांचे शिद्दी व हाटेंटाट लोक यांस धर्म ह्मणून फार-सा नाहीं. राज्यामध्यें कांहींच बंद नाहीं, आणि स-र्वत्र दांडगाई व पुंडावे फार आहे.

---

## प्रकरण ५.

## आमेरिका.

१ विभाग. या खंडांत उत्तर आणि दक्षिण असे दोन विभाग आहेत. ते पानामा या नावाचे संयोगी भूमीनें जोडिले आहेत. १ उत्तर अमेरिकेमध्यें वायव्यकोण-यास रुशिअनाचें राज्य, त्याचा आली-कडेस इंग्रेजांचें राज्य; हे मोठ्या पांच सरोवरांचा उत्त

रेस आहे. याचा दक्षिणेस स्वतंत्र संस्थानें, हीं २४ आहेत. यांत आट्लांटिक सागरापासून मिसिसिप्पी नदीचे पश्चिमेस लुइसिआना प्रांतपर्यंत देश आहे. याचे दक्षिणेस मेक्सिको अथवा मेहिको, आणि ग्वाटिमाला हीं प्रजासत्ताक संस्थानें आहेत. ग्रीनलान्ड हें बेट व त्याचा लगत जो प्रदेश आहे तो आमेरिकाखंडाचाच भाग असी पूर्वी समजूत होती, परंतु बाफिनचा उपसागरापासून बेहरिंगचे सामुद्रधुनीस जाण्यास जलमार्गाचा रस्ता खास आहे, परंतु तो सर्व काळ बर्फानें बुजलेला असतो, असा आतां निर्णय झाला आहे. दक्षिणअमेरिकेंत, कोलम्बिआ देश वायव्यकडेस आहे. तसाच ओरिनोको आणि आमाझोन या नद्या मधील गिआना देशांत कांहीं इंग्लिशांचा, कांहीं फ्रेंच यांचा व कांहीं डच यांचा अंमल आहे. पश्चिम कांठावर पिरु आणि चीली हे देश आहेत. आमाझोनिआ, आमाझोन नदीचे दक्षिणेस मध्यभागीं आहे. त्याचे पूर्वेस ब्राझील आहे. त्याचा आणि चीली प्रांताचामध्यें लापलाटा आहे. आणि सर्वांचे दक्षिणेस पाटागोनिआ आहे.

२ मुख्य शहरें. १ इंग्रजी राज्यांत, क्विबेक,

राजधानी, आणि मोंत्रिआल हीं दोन कानडा प्रांतांत लारेन्स नदीवर आहेत. किंगस्तन ओन्तेरिओ सरोवराचा ईशान कोपऱ्यास, व योर्क त्याचाच नैर्ऋत्य कोपऱ्यास आहे. फ्रेडरिक शहर न्यूब्रन्सविक प्रांतांत, आणि हालिफाक्स नोवा स्कोशिआ प्रांतांत आहे. २ स्वतंत्र संस्थानांत, वाशिंगटन राजधानी, फिलाडेल्फिआ, पेन्सिल्वनिआ प्रांतांत; चार्लस्तन, दक्षिणकारोलीना प्रांतांत; आणि रिचमोन्ड विर्जीनिआ प्रांतांत. ३ ग्वाटिमाला देशांत, ग्वाटिमाला आणि न्युग्वाटिआल. ४ कोलंबिआदेशांत, सान्टाफे, राजधानी. क्वीटो, आन्डीस पर्वताचा पायथ्याजवळ आहे व कार्थाजीना हें उत्तर कांठीं बंदर आहे. ५ गिआनादेशांत; कायेन एथें मिरीं उत्पन्न होतें, आणि पारामारिबो ह्मणून एक डच शहर आहे. ६ पिरू देशांत, लीमा, राजधानी, आणि चीली देशांत वाल्पारेसो ह्मणून पासिफिक महासागराचा कांठीं बंदर आहे. ८ लाप्लाटा देशांत, ब्वैनोस एरेस राजधानी लाप्लाटा नदीचा कांठीं आहे. ९ ब्राझील देशांत, सेंट सिबास्तिआन राजधानी व रिओजानेरो त्याच नदीचा कांठीं आहे. बा-

हिआ अथवा सेंट साल्वडोर, आणि ओलिन्डा हीं बंदरें आहेत. १० पश्चिम हिंदी बेटांत, किंग्स्तन, जामेका बेटांतील मुख्य शहर. आणि हावान्ना हें कूबा बेटांत मुख्य शहर आहे.

३ पर्वत. या खंडांत दक्षिणेपासून उत्तरेपर्यंत एक पर्वत गेला आहे, त्याचा दक्षिणआमेरिकेंतील भाग फार उंच आहे. त्याचें नाव आन्डीस आहे. त्याचें फार उंच टेंकाड चिंबोरेझो नामें आहे. त्याशिवाय आन्टिसाना ह्मणून सांप्रत शांत झालेलें ज्वालामुखी टेंकाड आहे, आणि कीटो शहराजवळ कोटोपाक्सी ह्मणून सांप्रत चालू अशी ज्वालामुखी आहे. या पर्वताचा उत्तरआमेरिकेंतील भाग मेक्सिको देशांत मात्र बराच उंच आहे, परंतु पुढें नीच होत गेला आहे. त्यास रोंकि (शिलामय) पर्वत असें नाव आहे. स्वतंत्र संस्थानांत आलेघानि पर्वत पूर्वेकडे गेला आहे.

४ द्वीपकल्पें. १ नोवास्कोशिआ. २ स्वतंत्र संस्थानांचे दक्षिणेस फ्लोरिडा आहे. ३ मेक्सिकोमध्यें युकाटाने. आणि ४ उत्तर आमेरिकेचेपश्चिम कांठीं कालिफोर्निआ आहे. यांशिवाय हड्-

सन सामुद्रधुनीचे उत्तरेस एक, आणि दक्षिणेस एक अशीं दोन द्वीपकल्पें आहेत.

५ भूशिरें १ केपहोर्न, आमेरिकेचें दक्षिण टोंक. २ सेंटरोक, ब्राझील देशांत आहे. ३ फेरवेल ग्रीनलान्डचे दक्षिणेस. ४ आलास्का हें भूशिर वायव्येस आहे.

६ बेटें. १ कूबा (पश्चिमेकडील बेटांत सर्वांहून मोठें) व पोर्टोरीको हीं दोन पूर्व कांठावरील बेटें, व पाटागोनिआ देशाचे पूर्वेस फाल्क लान्ड बेटें, आणि पासिफिक सागरांत चीलीचा कांठावर जुआनफेर्नान्डेज हीं सर्व स्पेनचा ताबेंत आहेत. २ जामेका, बार्बेडोस, आन्टीगा, सेन्टविन्सेन्ट आणि त्रिनिदाद हीं बेटें आणि कानडयाचे पूर्वेस न्यू फौनलान्ड म्हणून बेट आहे तें आणि उत्तरआमेरिकेचे पश्चिमेचें कांठा या सर्वांत इंग्रजांचा अमल आहे. ३ ग्वाडालूप, मार्टिनीक वगैरे बेटें फ्रेंचांचे स्वाधीन आहेत. ४ क्यूरासोआ आणि सेंट युस्तेशिआ हीं डचलोकांचा राज्याखालीं आहेत, हेती अथवा सेंट डोमिंगो यांत पूर्वी फ्रान्स आणि स्पेन यांची सत्ता होती, परंतु आतां तें स्वतंत्र काफ्री संस्थान आहे.. मायेल्ला·

न सामुद्रधुनीचे दक्षिणेस टेराडेल्फूइगो वगैरे बेटांचा समूह आहे, आणि कीटोचे पश्चिमेस गालापेगोस हीं बेटें आहेत, तेथें वस्ती होत नाहीं.

७ उपसागर आणि अखातें. ईशानीकडेस बाफिनचा आणि हड्सनचा असे दोन उपसागर आहेत. मेक्सिकोचा आणि फ्लोरिड्डाचा हे त्या नावांचा देशांचा कांठांवर आहेत. कारिब्बी बेट आणि आमेरिका यांचामध्यें कारिब्बीअन समुद्र आहे. त्यांत होन्डूरास आणि काम्पीचा हीं अखातें आहेत. सेंटलारेन्स हे या नावाचे नदीचा मुखाजवळ आहे. नोवा स्कोशिआ आणि नवें ब्रन्स्विक यांचा मध्यें फन्डि हें अखात आहे. कालिफोर्निआचें अखात, तें द्वीपकल्प आणि मेक्सिको यांचा मध्यें आहे, आणि नुटकासौन्ड, हें कादा या बेटांमध्यें आहे.

८ सामुद्रधुन्या. १ डेविसची बाफिनचा उपसागराचा मार्ग. २ हड्सनची त्याच नावाचा उपसागराचें द्वार. ३ माघेलानची, दक्षिण आमेरिका आणि टेराडेल्फूइगो यांचामध्यें आहे.

९ नद्या. १ उत्तरआमेरिकेंत मिसिसिप्पी ही

पश्चिमेकडील पर्वतांतून निघून मिस्सूरी, ओहिओ आणि टानसी नदी यांचा संग्रह आपल्यामध्यें करून दक्षिणेकडेस मेक्सिकोचा अखातास गेली आहे. सेंटलारेन्स, हिची उत्पत्ति उत्तरेकडील मोठ्या सरोवरांत आहे, आणि ही पूर्वगामिनी होऊन त्याच नावाचा अखातास मिळाली आहे. रीओडेल्नार्थ (उत्तरनदी) ही मेक्सिको देशांत आहे. २ दक्षिणआमेरिकेंत आमाझोन ही पृथ्वींत सर्वांहून मोठी नदी आहे. इजमध्यें मदीरा वगैरे सुमारें २०० नद्या मिळून ही आट्लांटिक सागरास गेली आहे. लाप्लाटा (रौप्य नदी) ही चीलीदेशांतील पाहाडांतून निघणाऱ्या पारागुवे, युरागुवे आणि पाराना ह्या तीन नद्यांशीं मिळून त्याच महासागरास गेली आहे. ती मुखापासून १०० कोशांवर ब्वेनोस एरेस एथें १५ कोश रुंद आहे. ओरिनोको, हिची उत्पत्ति गियाना प्रांतांत आहे, तेथून ती वर्तुळ गामिनी होऊन त्रिनिदाद बेटाचे आग्नेयीस त्याच समुद्रास मिळाली आहे.

१० सरोवरें. उत्तर आमेरिकेंत ओंतेरिओ, एरी, ह्युरनू, मिचीगान आणि सुपीरिअर (श्रेष्ठ) या नावांचीं समुद्रासारिखीं पांच सरोवरें आहेत तीं पर-

रपरास लगत आहेत ह्मणून व्यापारास फार सोय आ-
हे. पहिलें आणि दुसरें यांचामध्यें निआगरा नदी-
चा धबधबा आहे, तसा पृथ्वींत दुसरे कोठें नाहीं. वि-
निपेग, स्लेव लेक (गुलामांचें सरोवर) बेरलेक
(आस्वलांचें सरोवर) आणि दुसरीं हीं सुपीरिअर या-
चा वायव्यंस एके ओळींत आहेत. स्वतंत्र संस्थानां-
त चाम्पलेन आणि मेक्सिको देशांत निकाराग्वे हीं
सरोवरें मोठींच आहेत. दक्षिणआमेरिकेंत टीतिका-
का हें लापलाटा देशाचे उत्तरेस, आणि माराकीबो,
हें कोलंबिआ देशांत आहे.

११ व्यापाराचे जिन्नस. कानडादेश, लांकर
लांकुड, जंगलीखार, मासे, इ० स्वतंत्र संस्थानें,
कापूस, तंबाखू, आणि तांदूळ. विर्जिनिआ प्रांता-
तील तंबाखू आणि ज्यॉर्जिआ आणि कारालीना या
प्रांतांतील कापूस व तांदूळ हे जिनस सारे पृथ्वींत उत्कृ-
ष्ट आहेत. मेक्सिको, पिरू, आणि ब्राझील यांत सो-
नें, रुपें, व हिरे यांचा मातबर खाणी आहेत. प-
श्चिम हिंदीबेटांत साकर, बुंद, तंबाखू, आणि गुळा-
ची दारू हे जिनस उत्पन्न होतात.

१२ धर्म आणि राज्यरीति. सर्व आमेरिका दे-

शांत युरोपीयन लोकांची वस्ती फार आहे. स्वतंत्र संस्थानांतील लोक इंग्लिशांचे वंशज आहेत. मेक्सिको आणि दक्षिण आमेरिका यांतील राहणारे स्पेन व पोर्तुगाल एथील लोकांपासून झाले आहेत. हे सर्व ख्रिस्तिअन आहेत. यां शिवाय तद्देशीय लोक आहेत ते अज्ञानी आहेत, त्यांस धर्माचे ज्ञान विशेष नाहीं. युरोपीअनांचीं संस्थानें पूर्वीं युरोप एथील आपआपल्या राजांचा हुकुमानें वागत होतीं, परंतु आतां स्वतंत्र आणि प्रजासत्ताक अशीं झालीं आहेत.

---

## प्रकरण ६.

१ वर लिहिलेल्या चार खंडांशिवाय हिंदी आणि पासिफिक या दोन महासागरांत बहुत मोठमोठीं बेटें आहेत. त्यांत आस्त्रेलिआ, आणि पोलिनीशिआ असे दोन विभाग आहेत.

२ आस्त्रेलिआ. यांत नवें होलान्ड, वानडीमन्स लान्ड, नवें झीलान्ड, पापूआ, अथवा नवें गिनी, नवें ब्रिटन, नवें कालिडोनिआ, नवें हेब्रिडीस इत्यादि बेटें आहेत. यांत नवें होलान्ड याचा पूर्व भाग न्यूसौथवेल्स आणि वानडीमन्स

लान्ड यांत प्रथम ब्रिटिश लोकांनीं वस्ती केली. पहिल्यामध्यें सिडे ह्मणून शहर आहे, तसेंच बंदिवानांचें ठिकाण बोत्ने बे नामें आहे. दुसऱ्या बेटांत होबार्ट शहर आहे. नवें होल्लान्ड आणि वानडीमन्सलान्ड यामध्यें बास याची सामुद्रधुनी आहे. आणि नवें झीलान्ड या नावाचीं दोन बेटें आहेत. यांमध्यें कूक याची सामुद्रधुनी आहे. या बेटांतील लोक मनुष्यास भक्षण करितात.

३ पॉलिनीशिआ, हीं बेटें पासिफिक महासागरांत आहेत. यांतील पिज्यू, कारोलैन आणि सान्डविच हे तीन जमाव आमेरिका आणि आशिआ यांचा मध्यें आहेत. फ्रेन्डली बेटें, नाविगेटर यांचीं बेटें आणि सोसायटी बेटें हीं आमेरिका आणि आस्त्रेलिआ यांमध्यें आहेत. या बेटांतील सर्व लोक मुळचे अज्ञान व मूर्त्तिपूजक होते; परंतु सोसायटी आणि सान्डविच या बेटांतील लोकांनीं आलीकडे खिस्ती धर्म घेतला आहे. सान्डविच जमावांतील ओव्हायी ही बेट एथें प्रथम जो कप्तान कूक नामें इंग्रेज गेला, त्यास त्यांनीं रागाचा आवेशानें एकाएकीं ठार मारिलें.

# प्रकरण ७.

पृथ्वी आपल्यासभोंवती पश्चिमेकडून पूर्वेकडे चोवीस तासांत एक वेळ फिरती. ह्मणून सूर्य चंद्र आणि तारा सर्वकाळ पूर्वेकडून पश्चिमेकडे जातात असें दिसतें. आणि त्यांचे उदय, अस्त इत्यादिक सुमारें २४ तासांनीं होतात. याच कारणास्तव सूर्याचे उदयास्त किंवा मध्यान्ह सर्व ठिकाणीं एक काळींच होत नाहींत; परंतु गोलाचे ३६० अंश केल्यास दर १५ अंशांस एक तास अथवा दर ६ अंशांस एक घटिका ह्मणजे दर अंशास दहा पळें इतकें अंतर पडतें.

२ ज्या रेषेवर पृथ्वी फिरती असें कल्पिलें आहे, तीस पृथ्वीचा आंस ह्मणावें. ही रेषा भूमध्यांतून जाती; आणि इच्या शेवटांस उत्तर ध्रुव आणि दक्षिण ध्रुव अशीं नांवें आहेत. बाकीच्या दिशा या दोहोंवरून समजाव्या.

३ दोन ध्रुव स्थानापासून सारख्या अंतरावर काढिलेलें जें पूर्व पश्चिम वर्तुळ त्यास विषुवैवृत्त ह्मणावें. यावर जे प्रदेश आहेत तेथील लोकांस रात्र दिवस सर्वदा सारखे असतात.

४ विषुववृत्तावर लंबरूप दोनही ध्रुवांतून जा-णारीं जीं वर्तुळें त्यांस याम्योत्तरें किंवा रेखावृत्तें असें नाव आहे. जा स्थळांतून जें याम्योत्तर जातें तें त्या स्थळाचें याम्योत्तर जाणावें. एका याम्योत्तरावर जितके प्रदेश असतात तितक्यांस एककाळीं मध्यान्ह होतात. ह्मणून त्यांस कचित् मध्यान्हवृत्तें हीं ह्मणतात.

५ कोणत्याही स्थळाचें विषुववृत्तापासून जें अंतर त्यास अक्षांश ह्मणावें. हे दक्षिण किंवा उत्तर असतात. आणि ० पासून ९० पर्यंत चढत जातात हें स्पष्टच आहे.

६ कोणत्याही स्थळाचें याम्योत्तर आणि दुसऱ्या एका ठरविलेल्या स्थळाचे याम्योत्तर या दोहोंमध्यें जें अंतर विषुववृत्तावर असतें त्यास रेखांतर किंवा रेखांश ह्मणावें. हें पश्चिम किंवा पूर्व; आणि ० पासून १८० अंश पर्यंत चढत असतें. हें रेखांतर मोजण्याचें ठिकाण हिंदूनीं कन्या कुमारी ठरविलें आहे, परंतु इंग्रेज लोक आपल्या राजधानी जवळ वेध करण्याचें ठिकाण ग्रीनिच आहे तेथून रेखांतर मोजीत असतात.

७ पृथ्वीचा व्यास ह्मणजे गर्भसूत्र ८००० मैल

आणि परिघ ह्मणजे घेर २५००० मैल आहे. याक-रितां एक एक अंशास सुमारें ६९ मैल होतात. ह्म णून कोणत्याही दोन स्थळांतील अंतर सूत घालून मो-जिलें, आणि तें विषुववृत्तावर लावून त्यांत जे अंश अ-सतील त्या संख्येनें ६९ गुणिले असतां त्या दोन स्थ-ळांमध्यें किती अंतर आहे तें समजेल. पृथ्वी पृष्ठ-फळ सुमारें १५ कोटि मैल आहे.

८ विषुववृत्ताचा दोनही बाजूंस २३॥ अंशांमध्यें ह्मणजे मकरवृत्त आणि कर्कवृत्त यांचामध्यें जो प्रदेश आहे त्यास उष्णकटिबंध असें नाव आहे, कारण या प्रदेशीं उष्णता फार आहे. वर लिहिलेल्या दोन संक्रांतिवृत्तांमध्यें आणि ध्रुववृत्तांमध्यें जे दोन प्रदेश आहेत त्यांस अनुक्रमें दक्षिण आणि उत्तर समशीतोष्णकटिबंध ह्मणतात, यांमध्यें उष्णता आणि थंडी हीं मध्यम आहेत. ध्रुववृत्तामध्यें जे प्रदेश आहेत त्यांस शीतकटिबंध असें नांव आहे, यांत सर्व काळ अतिशय शैत्य आणि बर्फ असतें आणि दिवस रात्रि यांचें मान महिना दोन महिने असें घडत जातां जातां ध्रुवाजवळ वर्षांत साहा महिनेपर्यंत सूर्य दिसत असतो, आणि साहा महिनेपर्यंत रात्र असती.

# प्रकरण ८.

## देशांची लांबी रुंदी.

१ आशिआखंडाची लांबी ६,००० मैल, रुंदी ५,३०० मैल, क्षेत्रफळ १,६०,४५,००० मैल, आणि त्यांत राहणारीं माणसें ६३ कोटि आहेत. यांत जे निरनिराळे देशांचे विस्तार व लोक संख्या लिहिली आहे ती केवळ सरासरी आहे, असें जाणावें.

| देश. | क्षेत्रफळ चौरस मैल. | माणसांची संख्या. |
|---|---|---|
| चीन. | १३,००,००० | ३६,७०,००,००० |
| रुशिआ. | ५५,००,००० | ६०,००,००० |
| हिंदुस्थान. | १२,८१,००० | १३,४०,००,००० |
| तुर्कस्थान. | ४,५९,००० | १,२०,००,००० |
| इराण. | ४,५०,००० | ९०,००,००० |

या खंडांत सर्वांपेक्षां हिमालय पर्वत उंच आहे, त्या हिमालय पर्वताची उंची २८,०७४ फूट ह्मणजे सुमारें $५\frac{१}{३}$ मैल आहे.

## नद्यांची लांबी.

| नावें. | मैल |
|---|---|
| १ यांगींचें क्यांग | ३,००० |
| २ येनिसी | २,९०० |
| ३ भागीरथी | १,६०० |
| ४ ब्रह्मपुत्रा | १,५०० |

२ युरोपखंडाची लांबी २,४०० मैल, रुंदी २,६०० मैल, क्षेत्रफळ ३८,००,००० मैल आहे, आणि त्यांत २४,५०,००,००० मनुष्यें आहेत.

| देशांचीं नावें. | क्षेत्रफळ चौरस मैल. | लोकांची संख्या. |
|---|---|---|
| रुशिअनाचें राज्य. ...... | २१,५०,००० | ५,२०,००,००० |
| आस्त्रिअनाचें राज्य. ...... | २,५८,००० | ३,६९,५०,००० |
| फ्रेंचराज्य. | २,०४,००० | ३,४२,१३,९२९ |
| इंग्रेजीराज्य. | १,१९,९२४ | २,६७,०७,९६५ |
| पुशिअनराज्य. | १,०७,८३२ | -,४९,२८,०० |

सान्यांपेक्षां थोरपर्वत आल्प्स हा १५,६६८ फूट उंच आहे. सान्यांपेक्षां थोर नदी वोल्गा इची लांबी

२,०४० मैल दुसरी डान्यूब १,८०० मैल लांब आहे.

३ आफ्रिकाखंडाची लांबी ४,९८८ मैल रुंदी ४,६१८ मैल, क्षेत्रफळ १,१८,७०,००० चौरसमैल आणि त्यांत राहणारे लोक ३ कोटि आहेत. परंतु ही संख्या केवळ खरी आहे असें नाहीं.

साऱ्यांपेक्षां मोठा पर्वत हबसी देशांमध्यें आहे त्याची उंची १५,००० फूट आहे.

४ आमेरिका खंडाची लांबी ९,१०० मैल, रुंदी, ३,२०० मैल क्षेत्रफळ १,५०,००,००० मैल, आणि त्यांतील लोक ४॥ कोटि आहेत.

| देशांचीं नावें. | क्षेत्रफळ चौरस मैल. | लोकसंख्या. |
|---|---|---|
| ब्राझील. | २७,००,००० | ६०,००,००० |
| इंग्रेजांचें राज्य. | २३,६०,००० | १७,५०,००० |
| स्वतंत्र संस्थानें. | २३,००,००० | १,७०,००,००० |
| मेक्सिको. | १२,९०,००० | ७८,००,००० |

साऱ्यांपेक्षां मोठा पर्वत आन्डीस, याचें शृंग सोराटा असें जास म्हणतात तें २५,२५० फुट उंच आहे. आमाझोन नदीची लांबी ३,३०० मैल आणि मिसिसिप्पी या नदीची लांबी ३,१६० मैल आहे.

# पुरवणी.

समुद्रांत पडण्याचा पूर्वी भरतीचें पाणी आंत येई इतकें जें नदीचें पात्र रुंद होतें त्या भागास खाडी (१५*) ह्मणतात.

परंतु या पुस्तकांत कोठें सामुद्रधुनीचा ठिकाणीं खाडी या शब्दाचा प्रयोग केला आहे. जसें, अयरिश खाडी, इंग्लिश खाडी, इत्यादि.

---

*नकाशा पाहा.